विशेष सहाय्य विभागांतर्गत राबविण्यात
येणाऱ्या योजनांना प्रसिध्दी देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्र. विसयो-२०११/प्रक्र २२९/विसयो-२
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ५ जानेवारी,२०१२

**वाचा :** १) केंद्र शासनाचे ज्ञापन क्रमांक J-११०६०/६/२००९-NSAP, दिनांक २९/०९/२०१०
२) शासन पत्र सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र विसयो-२०११/प्रक्र२२९/विसयो-२, दिनांक ३ जानेवारी ,२०१२
३) महाराष्ट्र लघुउदयोग विकास महामंडळाचे पत्र क्रमांक पुविका/विपणन/पोब/२०११-१२/९७८ दिनांक ४ जानेवारी,२०१२

**प्रस्तावना :** विशेष सहाय्य कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांना सचित्र फ्लेक्स बॅनर्स स्वरुपातील साहित्य छपाई करुन पुरवठा करण्याबाबत संदर्भ क्रमांक २ येथील आदेशान्वये महाराष्ट्र लघुउदयोग विकास महामंडळास कार्यादेश देण्यात आलेला आहे. सदर कार्यादेशाची एकूण रक्कम रुपये ८१,३५,१००/- अधिक सेवाकर (१०.३० टक्के) रु.८,३७,९१५/- = रु.८९,७३,०१५/- ( अक्षरी रुपये एकोणनव्वद लक्ष त्र्याहत्तर हजार पंधरा फक्त ) इतकी आहे. कार्यादेशातील अटी व शर्ती मधील अट क्रमांक ३ नुसार कार्यादेशाच्या ५० टक्के आगाऊ रक्कम दयावयाची आहे व उर्वरित ५० टक्के रक्कम मालाचा पुरवठा झाल्यावर अदा करावयाची आहे. या संदर्भात महामंडळाने संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये कार्यादेशाच्या ५० टक्के आगावू रक्कम अदा करण्याची विनंती केली आहे. त्यानुसार महाराष्ट्र लघुउदयोग विकास महामंडळास कार्यादेशाच्या ५० टक्के म्हणजेच रु. ४०,६७,५५०/- अधिक सेवाकर (१०.३० टक्के ) रु. ४,१८,९५८/- = रुपये ४४,८६,५०८/- (अक्षरी रुपये चव्वेचाळीस लक्ष शहाऐंशी हजार पाचशे आठ फक्त ) इतकी आगावू रक्कम महाराष्ट्र लघुउदयोग विकास महामंडळास अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र लघुउदयोग विकास महामंडळास आगावू रक्कम रुपये रु. ४०,६७,५५०/- अधिक सेवाकर (१०.३० टक्के ) रु. ४,१८,९५८/- = रुपये ४४,८६,५०८/- (अक्षरी रुपये चव्वेचाळीस लक्ष शहाऐंशी हजार पाचशे आठ फक्त ) अदा करण्यास या व्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्चासाठी एकूण रुपये ४४,८६,५०८/- (अक्षरी रुपये चव्वेचाळीस लक्ष शहाऐंशी हजार पाचशे आठ फक्त ) इतका निधी याव्दारे जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांना वितरित करण्यात येत आहे व या खर्चासाठी तहसिलदार, तालुका- करवीर, जिल्हा - कोल्हापूर यांना याव्दारे प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. तहसिलदार, तालुका-करवीर, जिल्हा - कोल्हापूर यांनी "महाराष्ट्र लघुउदयोग विकास महामंडळ मर्यादीत" या नावाने रु. ४४,८६,५०८/- (अक्षरी रुपये चव्वेचाळीस लक्ष शहाऐंशी हजार पाचशे आठ फक्त) इतक्या रकमेचा धनादेश तात्काळ काढावा. यासाठी संक्षिप्त देयकावर रक्कम आहरित करण्यात यावी व तपशिलवार देयके एक महिन्याच्या कालावधीत सादर करण्यात यावीत.

४. उपरोक्त खर्च, मागणी क्र. एन-३, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण,१०४-वृध्द विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण (०८)(०६) इंदिरा गांधी राष्ट्रीय

वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना व राष्ट्रीय कुटुंब लाभ योजना अंमलबजावणीसाठी प्रशासकीय खर्च (केंद्र पुरस्कृत योजना ) (२२३५ ३०१४) ५०-इतर खर्च या लेखाशिर्षाखाली जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांना सन २०११-१२ मध्ये उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर खर्चाचे लेखे जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी ठेवावेत.

५. सदर खर्च केंद्र शासनाच्या संदर्भ क्र. १ येथील ज्ञापनातील अनु.क्र.२(i)(c) Information Education and Communication (IEC)-Awareness Generation Activities-use of media या प्रयोजनास्तव व तरतुदीनुसार करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४३६/व्यय-१४ दिनांक २ डिसेंबर,२०१० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१२०१०५१०३०३११३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ग.कि.वाघ )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
विभागीय आयुक्त, पुणे विभाग
जिल्हाधिकारी, कोल्हापूर
तहसिलदार, तालुका- करवीर, जिल्हा कोल्हापूर
संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन,५ वा मजला, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई ( २ प्रती )
जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता ), मुंबई / नागपूर
वित्त विभाग (अर्थसंकल्प-७) मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, (विसयो-१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
निवड नस्ती (विसयो-२)